**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारीतील महामंडळाच्या आस्थापनेवरील गट "क" व गट "ड" मधील अनुकंपा तत्वावर रिक्त पदे भरणेबाबत..**



**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमाक: एमपीसी-२०१९/प्र.क्र.९०/महामंडळे**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ७ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/आठ, दि. २१/०९/२०१७.

२.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: अकंपा-१२२१/प्र.क्र.११२/का-८,दि. २७/०९/२०२१.

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: अकंपा-१२२१/प्र.क्र.१८६/का-८, दि.२६/०८/२०२१.

**प्रस्तावना:-**

शासन सेवेत कार्यरत असताना मृत पावलेल्या /दिवंगत झालेल्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या वारसांना शासन सेवेत नियुक्ती देण्यासाठी अनुकंपा नियुक्ती बाबतच्या सर्व शासन निर्णय, परिपत्रके यांचे एकत्रिकरण करुन, सामान्य प्रशासन विभागाने शासन निर्णय क्रमांक अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/ आठ, दिनांक २१/०९/२०१७ अन्वये सर्व समावेशक शासन निर्णय निर्गमित केला आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २७/९/२०२१ च्या शासन निर्णयानुसार गट "अ" व गट "ब" या संवर्गातील कर्मचाऱ्याचे शासकीय सेवेत असतांना निधन झाल्यास त्याच्या कुटूंबातील एका पात्र सदस्यास गट "क" व गट "ड" अनुकंपा नियुक्ती अनुज्ञेय करण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णयातील तरतुदी या केवळ शासन कर्मचाऱ्यांपुरतेच सिमीत आहे. सदर तरतुदी या जिल्हापरिषदा/ नगरपरिषदा / महानगरपालिका /महामंडळे/ प्राधीकरणे/ व्यापारी उपक्रम इत्यादी तत्सम आस्थापनेवरील कर्मचाऱ्यांना थेट लागू होणार नाहीत. त्यासाठी संबधित प्रशासकीय विभागाने स्वतंत्रपणे निर्णय घेणे आवश्यक राहील असे या शासन निर्णयात नमूद कले आहे. त्यानुषंगाने सामान्य प्रशासन विभाग दिनांक २१/९/२०१७ व दिनांक २७/९/२०२१ रोजीचा शासन निर्णयाचा आधार घेऊन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारीतील १) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ, मर्या., मुंबई. २) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई. ३) साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्या., मुंबई. ४) गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ मर्या., पुणे या चारही महामंडळाच्या आस्थापनेवरील गट "अ" व "ब" तसेच गट "क" व "ड" या संवर्गातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे शासन सेवेत असतांना निधन झाल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटूंबातील एका पात्र सदस्यास महामंडळाच्या सेवेत वर्ग ३ किंवा वर्ग ४ म्हणजेच गट "क" व गट "ड" या संवर्गात अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्यासाठी धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-** सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अखत्यारीतील १) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या.मुंबई २) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई ३) साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्या., मुंबई ४) गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ मर्या., पुणे या चारही महामंडळाच्या आस्थापनेवरील गट “अ” व “ब” तसेच गट “क” व “ड” या संवर्गातील कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे शासन सेवेत असतांना निधन झाल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी यांच्या कुटूंबातील एका पात्र सदस्यास महामंडळाच्या सेवेत वर्ग ३ किंवा वर्ग ४ म्हणजेच गट “क” व गट “ड” या संवर्गात अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्यास अनुज्ञेय करण्यात येत आहे.

१. सदर अनुकंपा तत्वावर महामंडळावरील सेवेत नियुक्ती देण्यासंबंधीच्या अटी व शर्ती सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/आठ, दिनांक २१ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट “अ” नुसार असतील.

२. तसेच महामंडळातील दिवंगत कर्मचा-याच्या कुटूंबियाने करावयाचा अर्ज व तत्संबंधी माहिती सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/आठ, दिनांक २१ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट “ब” नुसार असेल.

३. अनुकंपा नियुक्तीसाठी नियुक्ती प्राधिकारी यांनी ठेवावयाच्या प्रतिक्षासूची सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.अकंपा-१२१७/प्र.क्र.१०२/आठ, दिनांक २१ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट “ड” नुसार असेल.

सामान्य प्रशासन विभाग दिनांक २१ सप्टेंबर, २०१७ व दिनांक २७ सप्टेंबर, २०२१ च्या शासन निर्णयानुसार अनुकंपा नियुक्तीसाठी नमूद केलेल्या तरतूदींच्या अधीन राहून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०७१५५८४९७२२२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA DESHMUKH

Digitally signed by VARSHA DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B030780A012E3648CB356030F4D4BFD6DCFED5E1526059A46C087A14FE3C29A0, cn=VARSHA DESHMUKH
Date: 2024.03.07 16:08:30 +05'30'

**( वर्षा देशमुख )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत-** १. मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरीषद, विधानसभा, विधान भवन, मुंबई,

५. विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

६. मा.मुख्य सचिव,

७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,

८. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग मंत्रालय, मुंबई
९. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ मर्या., मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्या., मुंबई
११. व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहिर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्या., मुंबई
१२. व्यवस्थापकीय संचालक,गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार कल्याण महामंडळ, पुणे.
१३. निवड नस्ती.